**नाबार्डच्या ग्रामीण पायाभूत विकास निधी अंतर्गत शासकीय गोदाम बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत. खापा, ता. तुमसर जिल्हा-भंडारा (सन- २०१९-२०)**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः गोदाबां-१०१९/ प्र.क्र.७१/नापु-१६-ब**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ०७ जानेवारी, २०२०.

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत अन्नधान्याच्या साठवणूकीसाठी भंडारा जिल्हयातील खापा, ता. तुमसर येथे १८०० मे. टन क्षमतेच्या गोदाम बांधकामांचा प्रस्ताव जिल्हा पुरवठा अधिकारी, भंडारा यांचेकडून शासनास प्राप्त झाला असून सदर गोदामांच्या अंदाजपत्रकास व बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्यास सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दर्शविली आहे. सबब, शासकीय गोदाम बांधणीच्या अंदाजपत्रकास व कामास नाबार्डच्या ग्रामीण पायाभूत विकास निधी अंतर्गत हाती घेण्यात आलेल्या प्रकल्पातंर्गत प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

२. खापा, ता. तुमसर येथे १८०० मे. टन क्षमतेच्या गोदाम बांधकामाच्या अंदाजपत्रकास व कामास पुढील अटींच्या अधिनतेने प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

I. सदर कामांचे सन २०१८-१९ च्या दरसूचीवर आधारीत सविस्तर अंदाजपत्रक संबंधित उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, तुमसर यांनी तयार केले असून कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, भंडारा, अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर तसेच उपभोक्ता विभागाच्या वतीने जिल्हा पुरवठा अधिकारी, भंडारा यांनी साक्षांकन केले आहे.

II. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरणविषयक प्रचलित नियमांचे तंतोतंत पालन करण्यात यावे.

III. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दि.०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

IV. काम सुरू करण्यापूर्वी जमिनीच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करून घेण्यात यावी व नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

३. **शासकीय गोदाम बांधकामाचे स्वरुप:-**

| अ.क्र. | जिल्हा | तालुका | प्रस्तावित गोदामाचे ठिकाण | गोदाम सख्या | प्रस्तावित गोदामाची क्षमता मे.टन | अंदाज पत्रकीय खर्च (रू.) | सा.बां.विभाग, मंत्रालय यांच्याकडील छाननीअंती मान्य अंदाजित खर्च (रू.) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | भंडारा | तुमसर | खापा | १ | १८०० | ७,७४,००,०००/- | ५,९३,५३,००० /- |
| **अक्षरी रूपये:- पाच कोटी त्र्यान्नव लक्ष त्रेपन्न हजार फक्त.** | | | | | | | |

४. वरीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्राप्त झालेल्या नवीन शासकीय गोदाम बांधकामासाठी निधी प्राप्त झाल्यांनतर शासकीय गोदाम बांधकामाचे काम तातडीने सुरू करण्यात येऊन विहित मुदतीत पूर्ण करण्यात यावे.

५. बांधकामासाठी विलंब अथवा इतर कारणाने वाढीव खर्च होणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी. सदर गोदामांचे बांधकाम सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात यावे. सदर गोदाम बांधकामांच्या कामांना आवश्यकतेनुसार निधी सार्वजनिक बांधकाम विभागास उपलब्ध करून देण्यात येईल.

६. सदर गोदाम बांधकामावरील खर्च सन २०१९-२० या वित्तीय वर्षात व तद्नंतर वेळोवेळी उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

७. उपरोक्त खर्च "मागणी क्र.एम-४, मुख्यलेखाशिर्ष ४४०८, ०२ अन्न, साठवण व वखार यावरील भांडवली खर्च, ०२, साठवण व वखार साठवण १०१, ग्रामीण भागात गोदाम बांधणे कार्य़क्रम (०१) नविन गोदामाचे बांधकाम (०१) (०१) नवीन गोदामांचे बांधकाम करणे (मुफसल) (राज्य हिस्सा) (कार्यक्रम) (४४०८ ०२४६), ५३ मोठी बांधकामे" या लेखाशिर्षांतर्गत खर्ची टाकण्यात यावा.

८. सदर गोदामांचे बांधकामाचे काम प्रगतीपथावर असताना संबंधित अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी कमीत कमी तीन वेळेस भेट देऊन कामाची गुणवत्ता उत्कृष्ट असल्याची खातरजमा करावी व तसा अहवाल जिल्हाधिकारी यांना वेळोवेळी लेखी स्वरूपात सादर करावा.

९. गोदामाचे बांधकाम पूर्ण झाल्यांनंतर गोदामाचा ताबा घेण्यापूर्वी सदर गोदामास जिल्हाधिकारी यांनी स्वत: भेट देऊन झालेले काम हे उत्कृष्ट दर्जाचे असल्याबाबत खातरजमा करावी. काही त्रुटी राहून गेल्या असल्यास त्याची पूर्तता सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करून घ्यावी व त्याचा स्थळ निरिक्षणाचा अहवाल अभिलेखामध्ये जतन करून ठेवावा.

१०. गोदाम बांधकामाच्या अंदाजपत्रकातील मुख्य गोदाम बांधकामाव्यतिरिक्त इतर सोयी सुविधांच्या समावेशाबाबत शासन स्तरावरुन दिलेल्या विविध सुचना विचारात घेवून जिल्हाधिकारी यांच्या स्तरावर खातरजमा करुन वजन काटे कार्यालये, प्रसाधन गृहे, इ. सोयींचा आवश्यकतेनुसार अंतर्भाव करावा.

११. सदरील शासकीय गोदाम बांधकामाची कामे पूर्ण होताच त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता जिल्हा पुरवठा अधिकारी, भंडारा यांनी घ्यावी.

१२. क्षेत्रीय स्तरावरुन प्राप्त अंदाजपत्रकाच्या छाननीअंती सार्वजनिक बांधकाम विभागाने Recapitulation Sheet मध्ये सुधारणा केल्या आहेत. सदर Recapitulation Sheet व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीसंबधी टिपणीच्या प्रती जिल्हाधिकारी व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांना निर्गमित करावयाच्या प्रतीसोबत जोडली आहे.

१३. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ च्या भाग-१, उप विभाग ५ मधील अनुक्रमांक-१ नुसार व महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक-१३४ नुसार प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार व अनौपचारीक संदर्भ क्रमांक-३६०/ १९/इमा-२, दि.०६.०८.२०१९ अन्वये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीनुसार सदरचा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

१४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००११४१५१२२०५५०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip Girdhar Chavan

Digitally signed by Pradip Girdhar Chavan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food, Civil Supplies and Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=46ad1667fce35440d37e8567cc278d78039b81154909a1162e319e905bd4e93b, serialNumber=f7e9a44534c5a6e0d2062d6f59ec690169fc00c18def69311f356364b1870337, cn=Pradip Girdhar Chavan
Date: 2020.01.14 14:51:10 +05'30'

**( प्र. गि. चव्हाण )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत-**

१. जिल्हाधिकारी,भंडारा.
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बाधंकाम प्रादेशिक विभाग, मुंबई /नागपूर.
३. वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक सरंक्षण विभाग,मुंबई.
४. उपायुक्त (पुरवठा) , नागपूर.
५. जिल्हा पुरवठा अधिकारी, भंडारा.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा.

७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बाधंकाम विभाग, भंडारा.

८. महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.

९. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.

१०. निवासी लेखा अधिकारी, मुंबई (वित्तीय सल्लागार व उप सचिव मार्फत)

११. वित्त विभाग (व्यय-१०, अर्थोपाय, अर्थबळ व अर्थसंकल्प-१६), मंत्रालय,मुंबई.

१२. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.

१३. नियोजन विभाग (का-१४११), मंत्रालय,मुंबई

१४. उप महाव्यवस्थापक, नाबार्ड, ५४, वेलस्ली रोड, शिवाजीनगर पुणे ४११००५

१५. निवड नस्ती/नापु-१६-ब.